इचलकरंजी नगरपरिषदेच्या इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पीटल मधील ४२ अधिकारी / कर्मचारी यांना सार्वजनिक आरोग्य विभागात सामावून घेण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः समावेश-२०२०/प्र.क्र.३३/आरोग्य-४

गो.ते.रुग्णालय आवार, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१.
दिनांक : २७ डिसेंबर, २०२१

**वाचा :-**

१) नगरविकास विभाग, शासन निर्णय क्र.एमयुपी-२०१५/प्र.क्र.३१०/नवि-१९, दि.३० जून, २०१६.
२) नगरविकास विभाग, शासन निर्णय क्र.एमयुएन-२०१६/प्र.क्र.३२३/नवि-१८, दि.०२ फेब्रुवारी, २०१९.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.९३/ आरोग्य-४, दिनांक २ ऑगस्ट, २०१७.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.९३/ आरोग्य-४, दिनांक १२ ऑक्टोबर, २०१७.
५) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१७/प्र.क्र.२८/ आरोग्य-४, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१८.
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय) राज्यस्तर, मुंबई यांचे क्र.संआसे/राज्यस्तर/कक्ष ३/टे७/इंगांमो रुग्णा इचलकरंजी समावेशन/संकीर्ण कोल्हापूर ४७/जा.क्र.७६०-६१/२०, दिनांक २७ जानेवारी, २०२०.
७) सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय) राज्यस्तर, मुंबई यांचे क्र.संआसे/कक्ष ३/टे७/इचलकरंजी समावेशन/संकीर्ण कोल्हापूर ४७/जा.क्र.६५५४-५५/२०, दिनांक ०५ नोव्हेंबर, २०२०.

**प्रस्तावना :-**

इचलकरंजी नगरपरिषदेचे इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पिटल शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरीत करण्याबाबतचा निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक २१ जून, २०१६ रोजी

झालेल्या बैठकीमध्ये घेण्यात आला होता. त्यास अनुसरुन उपरोक्त संदर्भाधीन दिनांक ३० जून, २०१६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून सदर रुग्णालयात कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचारी यांचे सार्वजनिक आरोग्य विभागाकडे शासन निर्णामधील अटी व शर्तीच्या अधीन राहून समावेशन करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन दिनांक १७.०१.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, इचलकरंजी नगरपरिषदेचे इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पिटल मधील कार्यरत ५३ अधिकारी / कर्मचारी यांना अटी व शर्तीच्या अधीन राहून सेवेत सामावून घेण्यास मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भाधिन दि.०२ फेब्रुवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये इचलकरंजी नगरपरिषदेच्या इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पीटलमधील ५४ कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित करुन त्यांच्या सेवा सार्वजनिक आरोग्य विभागाकडे शासन निर्णयामधील अटी व शर्तीच्या अधिन राहून हस्तांतरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन इचलकरंजी नगरपरिषदेकडील ४२ अधिकारी /कर्मचाऱ्यापैकी ४० अधिकारी / कर्मचारी दि.३० एप्रिल, २०१९ रोजी व उर्वरित २ कर्मचारी दि.०२.०५.२०१९ रोजी उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या कार्यालयाकडे हजर रिपोर्ट सादर केलेला आहे. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील रुग्णालयात समावेशन करण्याबाबत विकल्प दिलेल्या, अधिकारी / कर्मचारी यांना सामावून घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

इचलकरंजी नगरपरिषदेचे इंदिरा गांधी मेमोरियल रुग्णालयातील “तक्ता-अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकूण ४२ अधिकारी / कर्मचारी यांना पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून ४० अधिकारी / कर्मचारी यांना दि.३० एप्रिल, २०१९ रोजी व उर्वरित २ कर्मचारी यानां दि.०२.०५.२०१९ पासून शासन सेवेत पुर्वलक्षी प्रभावाने सामावून घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**तक्ता-अ**

| अ.क्र. | अधिकारी / कर्मचाऱ्यांचे नाव | पदनाम | वेतनश्रेणी (रुपये) | शासन सेवेत प्रविष्ट झाल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | डॉ. जयेश धोंडीलाल शहा | बालरोग तज्ञ | १५६००-३९१०० (६६००) | दि.०१.०५.२०१९ |
| २ | डॉ. जितेंद्र बापुसो हुपरे | वैद्यकीय अधिकारी | १५६००-३९१०० (५४००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३ | डॉ. अशोक बाबुराव महाजन | वैद्यकीय अधिकारी | १५६००-३९१०० (५४००) | दि.०१.०५.२०१९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | येरुशा विल्यम अँथोनी | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ५ | शुभांगी अरुन केसरकर | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ६ | मिनाक्षी सुरेश बिरनगे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ७ | अनुराधा बाबासाहेब सुर्यवंशी | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ८ | संगीता श्रीकांत पठाणे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ९ | रिमा शरद कांदणे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| १० | कमल यशवंत चोपडे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ११ | शिरीन कलंदर देसाई | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| १२ | वर्षा अमोल कडगावे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| १३ | रिबेका प्रकाश लोखंडे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| १४ | सुरेखा श्रीहरी यादव | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०२.०५.२०१९ |
| १५ | लक्ष्मीछाया राजेद्र गावडे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| १६ | दिपाली रमेश पाताडे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| १७ | डिना उदय बिरांजे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| १८ | मीना डेव्हीड सातपुते | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| १९ | शामकांत श्रीपती सर्वगोडे | मेल नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २० | संतोष माणिक गावंदे | मेल नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २१ | सुप्रिया सुहास सडेकर | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २२ | पंकजा प्रकाश कवठेकर | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २३ | मनिषा योहान ऐतवडेकर | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २४ | निता संतोष गावंदे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २५ | स्वाती सुनिल बारवाडे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २६ | प्रभाकर विनायक गायकवाड | मेल नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २७ | बापू मौला मुल्ला | मेल नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २८ | लिया आणाप्पा भंडारे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| २९ | संतोषा सचिन बिडकर | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३० | मनिषा विवेकांनद मालेकर | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३१ | सुरेश लक्ष्मण आवळे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३२ | श्वेता शशिकांत होळकर | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३३ | सुचिता श्रीराम सावंत | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३४ | विद्या राजेंद्र बदामे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३५ | लतिका आनंद वायदंडे | स्टाफ नर्स | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३६ | रंजना सोमनाथ गजगेश्वर | फिजिओथेरेपीस्ट | ९३००-३४८०० (४२००) | दि.०२.०५.२०१९ |
| ३७ | रुक्मिनी राजेंद्र माने | लॅब टेक्नीशियन | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३८ | सुर्यभान पांडूरंग गायकवाड | लॅब टेक्नीशियन | ९३००-३४८०० (४२००) | दि.०१.०५.२०१९ |
| ३९ | राजेश जयपाल मिणेकर | फार्मासिस्ट | ५२००-२०२०० (२८००) | दि.०१.०५.२०१९ |
| ४० | सुजाता महेश परमाळे | फार्मासिस्ट | ५२००-२०२०० (२८००) | दि.०१.०५.२०१९ |
| ४१ | सर्जेराव शामराव कांबळे | एक्स रे टेक्नीशियन | ५२००-२०२०० (२८००) | दि.०१.०५.२०१९ |
| ४२ | प्रशांत शंकरराव सामंत | एक्स रे टेक्नीशियन | ५२००-२०२०० (२८००) | दि.०१.०५.२०१९ |

अटी व शर्ती :-

१) सदर एकूण ४२ अधिकारी/कर्मचाऱ्यापैकी ४० कर्मचाऱ्यांना दिनांक ०१/०५/२०१९ पासून व उर्वरित २ कर्मचाऱ्यांना दि.०२.०५.२०१९ पासून पुर्वलक्षी प्रभावाने शासन सेवेत प्रविष्ट झाल्याचे समजण्यात यावे.

२) ज्या अधिकारी / कर्मचारी यांचे समावेशन करावयाचे आहे, त्यांच्या नियुक्त्या विहित मार्गाने जाहिरात देऊन, परीक्षा घेऊन/निवड समितीमार्फत निवड झालेल्या असाव्यात.

३) संबंधित अधिकारी / कर्मचारी त्या त्या पदाच्या विहित सेवाप्रवेश नियमानुसार नियुक्तीसाठी पात्र ठरणे आवश्यक राहील.

४) ज्या दिनांकास संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचे ज्या संवर्गात समावेशन होईल, तो दिनांक त्यांच्या संबंधित संवर्गात ज्येष्ठतेचा दिनांक धरण्यात यावा.

५) जे अधिकारी / कर्मचारी समावेशनास पात्र नसतील किंवा पद उपलब्ध नसेल अशा अधिकारी/ कर्मचारी यांच्या सेवा नगरपरिषदेस परत कराव्यात.

६) अधिकारी / कर्मचारी यांची वेतनश्रेणी नमूद करण्यात आली असली तरीही निश्चित करताना सेवा प्रवेश नियमानुसार अनुज्ञेय असणारी वेतनश्रेनी मंजूर करण्यात यावी.

७) समावेशन करावयाच्या कर्मचाऱ्यांचे शासनाच्या प्रचलित नियमानसार भविष्य निर्वाह निधी, गट विमी योजना, व्यवसाय कर, आयकर व इतर वजाती करण्यात येईल.

८) सदर कर्मचाऱ्यांचे समावेशन झाल्याच्या दिनांकापासून राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना-१९८२ पुरते त्यांना त्या दिनांकापासून राज्य शासकीय कर्मचारी म्हणून गणण्यात यावे.

९) राज्य स्तरीय संवर्गात समावेशन झाल्यानंतरच्या १ जानेवारीपासून सदर कर्मचारी गट विमा योजनेचे पूर्ण सदस्य होतील आणि त्यांना सध्या अस्तित्वात असलेले गट विमा योजनेचे सर्व नियम लागू राहतील.

१०) त्यांचे समावेशन झाल्याच्या दिनांकापासून त्या वर्षाच्या दिनांक ३१ डिसेंबर पर्यंत त्यांच्याकडून त्यांच्या संवर्गानुसार लागु असलेल्या विमानिधीची वर्गणी घेण्यात यावी. तसेच या कालावधीत त्यांचा मृत्यू झाल्यास त्यांना सध्या अस्तित्वात असलेले विमा निधीविषयक नियम लागू राहतील.

११) सदर कर्मचाऱ्यांकडून राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना -१९८२ ची वर्गणी सध्या लागु असलेल्या योजनेच्या नियमानुसार घेण्यात यावी.

१२) समावेशन करावयाच्या कर्मचाऱ्यांचे जात वैधता प्रमाणपत्र, मराठी, हिंदी भाषा परीक्षा, एम.एस.सी. आय.टी. चे प्रमाणपत्र, टंकलेखनाची अर्हता याबाबींची पूर्तता १ वर्षाच्या आत करण्याच्या अटीच्या अधीन राहून त्यांचे समावेशन करण्यात यावे.

१३) समावेशन करावयाच्या कर्मचारीवृंदाना समावेशनाच्या दिनांकापासून महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ व त्या अनुषंगाने रजाविषयक लाभ अनुज्ञेय राहतील.

१४) सदर कर्मचाऱ्यांचे भविष्य निर्वाह निधी इचलकरंजी नगरपरिषद इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पिटल मार्फत, महालेखापाल, मुंबई यांचेकडे हस्तांतरीत करण्यात यावेत.

१५) समावेशन करावयाच्या कर्मचाऱ्यांच्या सेवा त्या त्या संवर्गात शासन समावेशनाच्या दिनांकापासून शून्य ज्येष्ठतेवर समाविष्ट करण्यात याव्यात.

१६) समावेशन करावयाच्या कर्मचारीवृंदाना, पूर्वीच्या इचलकरंजी नगरपरिषद इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पिटल सेवेचा लाभ हा वेतन संरक्षण तसेच आश्वासित प्रगती योजनेच्या प्रयोजनार्थ अनुज्ञेय ठरणार नाही.

१७) समावेशन करावयाचे अधिकारी /कर्मचारी त्या त्या पदाच्या सेवाप्रवेश नियमानुसार विहित केलेली शैक्षणिक अर्हता अनुभव इ. बाबींची पूर्तता करतील त्यांच्या समावेशनासंबंधीचे नियुक्तीबाबतचे आदेश संबंधित नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्याबाबत कार्यवाही करावी व त्याची प्रत शासनास सादर करावी. यापैकी गट-अ व गट-ब च्या अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबतचे आदेश शासन मान्यतेने निर्गमित करण्यात यावे.

१८) समावेश करावयाच्या अधिकारी / कर्मचारीवृंदाना समावेशनाच्या दिनांकापासून "परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन योजना" लागू राहील की त्यांना महाराष्ट्र नागरी

सेवा (निवृतिवेतन) वेतन, १९८२ लागू राहील. याबाबत वित्त विभागाच्या सल्याने स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय, नगर विकास विभाग, सामान्य प्रशासन विभाग व विधी व न्याय विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च “मागणी क्रमांक आर -१ मुख्य लेखाशिर्ष, २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०६)-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०६)(०१)- मुफसल क्षेत्रातील अध्यापन्नेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६)” या लेखाशीर्षाखालील सन २०२१-२०२२ या वित्तिय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०३१७१४४७२११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40fdba39a26dd429d5be80f9cd76998906ed5012a776fbe5072661d97c2c56c9, pseudonym=BF4C0C742439A64408C0621CD1FF33CD1AD8C6B9, serialNumber=C351F74FB3439ACA71466FCFBB2509C3310AE753E395A89FFA7C6E3887B0AADF, cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2021.12.27 14:38:41 +05'30'

(दी.नि. केंद्रे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२
२. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
३. प्रधान सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
४. इचलकरंजी नगरपरिषदेचे इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पिटल
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
६. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
७. संचालक (१), आरोग्य सेवा,आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.

८. संचालक (२), आरोग्य सेवा, पुणे.

९. सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये) राज्यस्तर, मुंबई.

१०. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.

११. वैद्यकीय आरोग्य अधिकारी, इचलकरंजी नगरपरिषदेचे इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पिटल.

१२. नगरविकास विभाग (नवि-२८) मंत्रालय,मुंबई

१३. सर्व सहसचिव / उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई

१४. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई

१५. निवडनस्ती (आरोग्य-४).